**मागणी क्र.झेडजी-३, प्रधानशीर्ष २२२५ अंतर्गत "ओ.बी.सी., ई.बी.सी. व डी.एन.टी. प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी मॅट्रिकपूर्व व मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती" या योजनेकरिता नवीन लेखाशीर्ष उघडण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**क्रमांक : शिवृत्ती-२०२२/प्र.क्र.१२/शिक्षण-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ०४ जुलै, २०२३.

**प्रस्तावना :-**

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षापर्यंत इतर मागासवर्ग प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी मॅट्रिकपूर्व शिष्यवृत्तीकरिता केंद्र व राज्य हिस्सा यांचे प्रमाण ५०:५० व डीएनटी प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी मॅट्रिकपूर्व शिष्यवृत्तीकरिता केंद्र व राज्य हिस्सा यांचे प्रमाण ७५:२५ असे होते तसेच इतर मागासबर्ग विद्यार्थ्यांसाठी मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्तीकरिता केंद्र हिस्सा १००% होता.

सामाजिक न्याय व अधिकारिता मंत्रालय, भारत सरकार यांनी विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांच्या भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेंतर्गत सन २०२१-२२ ते २०२५-२६ या कालावधीकरीता दिनांक ०५.०५.२०२२ रोजीच्या पत्रान्वये सुधारीत मार्गदर्शक सूचना जारी केलेल्या आहेत. त्यानुसार भारत सरकार मॅट्रिकपूर्व व मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजना या पीएमयशस्वी एकछत्री योजनेअंतर्गत घ्यावयाच्या असून योजनांचे नाव ओ.बी.सी., ई.बी.सी. व डी.एन.टी. प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी मॅट्रिकपूर्व व मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती असे झाले असून योजनेंतर्गत शैक्षणिक वर्ष २०२२-२३ पासून लाभाचे वितरण केंद्र हिस्सा ६०% व राज्य हिस्सा ४०% असे असणार आहे. योजनेचे स्वरुप बदलल्याने मॅट्रिकपूर्व व मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती योजनेकरिता नवीन लेखाशिर्ष मा. प्रधान महालेखापाल, मुंबई यांच्या मान्यतेने प्राप्त करुन घेण्यात आली असून त्यानुसार योजनेकरिता योजना सांकेतांक तसेच संगणक सांकेतांक घेण्यात आले आहेत. सदर लेखाशिर्षास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"ओ.बी.सी., ई.बी.सी. व डी.एन.टी. प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी मॅट्रिकपूर्व व मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती" या केंद्र पुरस्कृत योजनांकरिता केंद्र हिस्सा ६०% व राज्य हिस्सा ४०% असे प्रमाण बदलले असून त्यानुषंगाने मागणी क्र.झेडजी-३, प्रधानशीर्ष २२२५ अंतर्गत नवीन लेखाशिर्षे उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे. नवीन लेखाशीर्षाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| लेखाशिर्षाचे मराठी नाव | लेखाशिर्षाचे इंग्रजी नाव |
|---|---|
| मॅट्रिकपूर्व लेखाशिर्ष | Pre Matric Scholarship |
| (१) मागणी क्र.झेडजी-३ | (1) Demand No.ZG-3 |
| २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण | 2225-Welfare of Scheduled Castes, Scheduled Tribes and Other Backward Classes and Minorities |
| ०३, मागासवर्गीयांचे कल्याण | 03- Welfare of Backward Classes |
| २७७- शिक्षण | 277- Education |
| (०७) पीएम यसस्वी योजना | (07) PM YASASVI Scheme |
| (०७)(०१) ओ.बी.सी., ई.बी.सी. व डी.एन.टी. प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी मॅट्रिकपूर्व शिष्यवृत्ती ( केंद्र हिस्सा ६०%) २२२५एफ७३७ | (07) (01) Pre Matric Scholarship for OBC, EBC and DNT students (Central Share 60%) 2225F737 |
| (कार्यक्रम) / दत्तमत | Scheme /Voted |

| | |
|---|---|
| (२) मागणी क्र.झेडजी-३ | (2) Demand No.ZG-3 |
| २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण | 2225-Welfare of Scheduled Castes, Scheduled Tribes and Other Backward Classes and Minorities |
| ०३, मागासवर्गीयांचे कल्याण | 03- Welfare of Backward Classes |
| २७७- शिक्षण | 277- Education |
| (०७) पीएम यसस्वी योजना | (07) PM YASASVI Scheme |
| (०७)(०२) ओ.बी.सी., ई.बी.सी. व डी.एन.टी. प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी मॅट्रिकपूर्व शिष्यवृत्ती (राज्य हिस्सा ४०%) २२२५एफ७४६ | (07) (02) Pre Matric Scholarship for OBC, EBC and DNT students (State Share 40%) 2225F746 |
| (कार्यक्रम) / दत्तमत | Scheme /Voted |

| लेखाशिर्षाचे मराठी नाव | लेखाशिर्षाचे इंग्रजी नाव |
|---|---|
| मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती | Post Matric Scholarship |
| (३) मागणी क्र.झेडजी-३ | (3) Demand No.ZG-3 |
| २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण | 2225-Welfare of Scheduled Castes, Scheduled Tribes and Other Backward Classes and Minorities |
| ०३, मागासवर्गीयांचे कल्याण | 03- Welfare of Backward Classes |
| २७७- शिक्षण | 277- Education |
| (०७) पीएम यसस्वी योजना | (07) PM YASASVI Scheme |
| (०७)(०३) ओ.बी.सी., ई.बी.सी. व डी.एन.टी. प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती (केंद्र हिस्सा ६०%) २२२५एफ७५५ | (07) (03) Post Matric Scholarship for OBC, EBC and DNT students (Central Share 60%) 2225F755 |
| (कार्यक्रम) / दत्तमत | Scheme /Voted |
| (४) मागणी क्र.झेडजी-३ | (4) Demand No.ZG-3 |
| २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण | 2225-Welfare of Scheduled Castes, Scheduled Tribes and Other Backward Classes and Minorities |
| ०३, मागासवर्गीयांचे कल्याण | 03- Welfare of Backward Classes |
| २७७- शिक्षण | 277- Education |
| (०७) पीएम यसस्वी योजना | (07) PM YASASVI Scheme |
| (०७)(०४) ओ.बी.सी., ई.बी.सी. व डी.एन.टी. प्रवर्गातील विद्यार्थ्यांसाठी मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती (राज्य हिस्सा ४०%) २२२५एफ७६४ | (07) (04) Post Matric Scholarship for OBC, EBC and DNT students (State Share 40%) 2225F764 |
| (कार्यक्रम) / दत्तमत | Scheme /Voted |

२. हे आदेश महालेखापाल कार्यालय (लेखा व हकदारी) १, महाराष्ट्र, मुंबई यांच्याशी विचारविनिमय करुन त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ख.वि/चा-१/ विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग/युओआर-०२/२०२२-२३/६६, दिनांक २४.०४.२०२३ तसेच, वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.८०५/२०२२/व्यय-१४,दिनांक २१/०९/२०२२ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७०५१२५७४३२३३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDHARTH AMRUTRAO ZALTE

Digitally signed by SIDDHARTH AMRUTRAO ZALTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=dc54b49c6f5c903027053476b3a6ef50b46ff44a7e8b820fef7bfdd100c56194, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8EA004AE581D6FF06989D826800FF7528B6FD6418579108C011AE21079E9E0C9, cn=SIDDHARTH AMRUTRAO ZALTE
Date: 2023.07.05 12:58:50 +05'30'

**( सिध्दार्थ झाल्टे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे
४. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. प्रधान महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण/ सर्व प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण
७. सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण/ सर्व सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
९. उपसचिव (अर्थसंकल्प)/ (शिक्षण-१), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती ( शिक्षण-१).